<u>जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करणेबाबत.</u>.
श्री.उदय सिताराम बिरारीस, कार्यकारी अभियंता

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन आदेश क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८४/सेवा-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, चौथा मजला, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १० जून, २०२५.

**वाचा :-**
१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०२३/प्र.क्र.४६/सेवा-४, दि.०२.०२.२०२४.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०२४/प्र.क्र.१८/सेवा-४, दि.०२.०५.२०२४.
३. केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतन धारकांचे कल्याण विभागाचे पत्र क्र.५७/०५/२०२१-पी व पीडब्ल्यू (बी), दि.०३.०३.२०२३.
४. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.नियुक्ती ११०७/(९९/२००७)/आ(सअश्रे-२), दि.०७.०९.२००७.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८४/सेवा-१, दि.२३.०५.२०२५.

**<u>प्रस्तावना</u> :-**

केंद्र शासनाच्या अधिकारी / कर्मचारी यांची नियुक्ती (Appointed) ज्या पदावर किंवा रिक्त जागेवर करण्यात आली आहे व ज्याची जाहिरात / भरतीची / नियुक्तीची अधिसूचना नवीन निवृत्तीवेतन योजना लागू करण्याच्या अधिसूचनेच्या दिनांकापूर्वी म्हणजेच, दि.२२.१२.२००३ पूर्वी निर्गमित झाली आहे व जे दि.०१.०१.२००४ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत दाखल झाले आहेत व ज्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू झाली, त्या केंद्र शासनाच्या अधिकारी / कर्मचारी यांना केंद्रीय नागरी सेवा (निवृत्ती) नियम, १९७२ / २०२१ लागू करण्याचा एक वेळ पर्याय (One Time Option) देणेबाबत केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतनधारकांचे कल्याण विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील कार्यालयीन ज्ञापनान्वये निर्णय घेण्यात आला आहे.

२. केंद्र शासनाच्या उपरोक्त निर्णयाच्या धर्तीवर, राज्य शासनाच्या सेवेत जे अधिकारी / कर्मचारी दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत नियुक्त करण्यात आले आहेत. तथापि, त्यांची पदभरतीची जाहिरात / अधिसूचना, दि.०१.११.२००५ पूर्वी निर्गमित झालेली आहे. अशा राज्य शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यासाठी एक वेळ पर्याय (One Time Option) संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेला आहे. या निर्णयानुसार, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील श्री. उदय सिताराम बिरारीस, कार्यकारी अभियंता यांचा जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करण्याबाबतचा विकल्प / अर्ज शासनास प्राप्त झालेला आहे.

**३.** श्री. उदय बिरारीस, कार्यकारी अभियंता यांची शासन सेवेत प्रथम नियुक्ती महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परिक्षा-२००४ (जाहिरात क्र.३७४ (१) एक (१)/२००४/तीन, दि.१५.०९.२००४) मध्ये, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार, जलसंपदा विभागात "सहाय्यक अभियंता, श्रेणी-२ (स्थापत्य)" या पदावर संदर्भाधीन दि.०७.०९.२००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये झाली होती, त्यानुसार, ते उक्त पदावर दि.२७.०९.२००७ (म.पू.) रोजी रुजू झाले होते.

**४.** तद्नंतर, श्री. उदय बिरारीस, कार्यकारी अभियंता यांची महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, वर्ग-१ मध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सन २००७ मध्ये सरळसेवा भरतीसाठी घेतलेल्या स्पर्धात्मक परिक्षेच्या निकालानुसार, सार्वजनिक बांधकाम विभागात "सहाय्यक अभियंता श्रेणी-१" या पदावर निवड करण्यात आली. त्यानुसार, ते सार्वजनिक बांधकाम विभागात दि.०१.०९.२०१० (म.पू.) रोजी रुजू झाले आहेत.

५. वित्त विभागाच्या दि.३०.०५.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकामधील नमूद सर्व अटींची पूर्तता होत असल्यामुळे, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि.२३.०५.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये, श्री. उदय बिरारीस, कार्यकारी अभियंता यांची पूर्वीची जलसंपदा विभागाकडील "सहाय्यक अभियंता, श्रेणी-२ (स्थापत्य)" या पदावरील दि.२७.०९.२००७ ते दि.३१.०८.२०१० (दोन्ही दिवस धरुन) या कालावधीची सेवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील "सहाय्यक अभियंता श्रेणी-१" या पदावरील दि.०१.०९.२०१० (म.पू.) पासूनच्या सेवेस जोडून देण्यात आली आहे.

**६.** श्री. उदय बिरारीस, कार्यकारी अभियंता यांची प्रथम नियुक्ती महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा-२००४, मध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची अधिसूचना क्र.३७४(१) एक (१)/२००४/तीन, दि.१५.०९.२००४ अन्वये, म्हणजेच, दि.०१.११.२००५ पूर्वी पदभरतीची जाहिरात / अधिसूचना निर्गमित केल्यानुसार झालेली आहे. सबब, श्री. उदय बिरारीस, कार्यकारी अभियंता यांना वित्त विभागाच्या दि.०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेले, श्री. उदय सिताराम बिरारीस यांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अभियंत्याचे नांव व पदनाम | सध्याचे कार्यालय | अर्ज / विकल्प प्राप्त दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. उदय सिताराम बिरारीस, कार्यकारी अभियंता. | कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्या., मुंबई. | १९.०४.२०२४ |

२. श्री. बिरारीस, कार्यकारी अभियंता यांनी जुनी निवृत्तिवेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्याचा पर्याय विहित मुदतीत सादर केलेला आहे.

३. श्री. बिरारीस, कार्यकारी अभियंता यांना वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०२.०२.२०२४ मधील तरतुदीनुसार, जुनी निवृत्तीवेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्यात येत असल्यामुळे, सबंधित अधिकाऱ्याच्या कार्यालय प्रमुखांनी त्यांचे नव्याने भविष्यनिर्वाह निधी (GPF) खाते तात्काळ उघडण्यात यावे. तसेच, त्यांचे राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली (NPS) मधील खाते बंद करुन, त्यातील कर्मचाऱ्याच्या हिश्श्याची रक्कम देय / अनुज्ञेय व्याजासह संबंधित कर्मचाऱ्याच्या नव्याने उघडण्यात आलेल्या भविष्यनिर्वाह निधी (GPF) खात्यात जमा करावी.

४. तसेच, श्री. बिरारीस यांच्या राष्ट्रीय निवृत्तिवेतन (NPS) खात्यातील राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम देय / अनुज्ञेय व्याजासह राज्याच्या एकत्रित निधीत वळती करण्यात यावी. याबाबतची सविस्तर कार्यपध्दती संदर्भाधीन दि.०२.०५.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आली आहे, त्यानुसार पुढील आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

५. वरील कार्यवाहीसाठी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२५०६१०१११७१०१८१८ असा आहे. हा शासन आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANAGHA ABHAY JAWALE

Digitally signed by ANAGHA ABHAY JAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=1b2d80236ea086889a45c2dcd2bcbeeb1963360ef86a463c0a11f7be167e68eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F265FDD947D3EB873F7094E1B871AF8C32B21F87C2B270064CF1A727E47C456D, cn=ANAGHA ABHAY JAWALE
Date: 2025.06.10 11:18:19 +05'30'

**( अनघा अभय जावळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

1. **श्री. उदय सिताराम बिरारीस, कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्या., मुंबई, यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्यामार्फत.**
2. **मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग मुंबई.**

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४. सचिव (रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उप सचिव, सेवा-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, आ (स.अ.श्रेणी-२), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी (आस्था-१ /आस्था-२/आस्था-३/सेवा-२/सेवा-६), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती / कार्यासन, सेवा-१.